**स्त्री अधिक्षिका, सार्वजनिक आरोग्य शुश्रुषा विद्यालय, नागपूर या कार्यालयातील ३ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२४ /प्र.क्र.१११/आरोग्य-३**

१० वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.

तारीखः १९ एप्रिल, २०२४

वाचा -

1) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक: अपदे-२०२३/प्र.क्र.१२२/आरोग्य-३, दिनांक-०६.१०.२०२३ .**
2) **सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीराग व जलजन्यरोग),पुणे यांचे पत्र क्रमांक-संसआसे/उसआसे नागपूर/अस्थायी पदे ०३/कक्ष-५२ ब/न.क्र.५८५/१०७३७-३९/२४, दिनांक-१५.०३.२०२४.**
3) **वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दि. २१ फेब्रुवारी,२०२४.**

**शासन निर्णय-**

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील स्त्री अधिक्षिका, सार्वजनिक आरोग्य शुश्रुषा विद्यालय, नागपूर येथील ३ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये स्त्री अधिक्षिका, सार्वजनिक आरोग्य शुश्रुषा विद्यालय, नागपूर येथील सहायक स्त्री अधिक्षिका (१ पद), वाहन चालक (१ पद) व वाहन स्वच्छक (१ पद) या एकूण ३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२४-२०२५ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - सार्वजनिक आरोग्य
००३ - प्रशिक्षण
(०१)(०३) - सार्वजनिक आरोग्य परिचर्या शाळा (२२१० ०४८७)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक,पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क,दि. २१.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या दि. २१.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत अस्थाई पदांना मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकिय विभागांनी तातडीने प्रस्ताव सादर करण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच संदर्भ क्र.०३ अन्वये वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार अस्थायी पदांना दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन तातडीने वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाकडून उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा. तसेच यापुढे अस्थायी पदांना सुधारित आकृतीबंधात समावेश करण्याबाबतची कार्यवाही तातडीने करावयाची आहे. त्यामुळे अस्थायी पदांची मुदतवाढ ही शेवटची मुदतवाढ समजण्यात यावी व त्यानुसार आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी, याबाबतची कृपया नोंद घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४१८१८३५३०३३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2024.04.19 12:35:33 +05'30'

**(क.प्र. पिसे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. अधिक्षिका, सार्वजनिक आरोग्य शुश्रुषा विद्यालय, परिचर्या शाळा, नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)